**अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी नंदुरबार येथे मध्यवर्ती क्रीडा केंद्र व ईगतपुरी, जि.नाशिक येथे क्रीडा प्रबोधिनी स्थापन करणे.**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्र.क्रीडाप्र-२००९/प्र.क्र.७४/का.१२
मंत्रालय विस्तार, मुंबई-३२.
दिनांक : २४ ऑगस्ट, २००९.

वाचा :-शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्र.शाशिम-१०९५/प्र.क्र.१६६/क्रीयुसे-३, दि.१८ नोव्हेंबर, १९९५.

प्रस्तावना :- अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांमध्ये जन्मत: असलेल्या विविध क्षमता काही ठराविक खेळांकरिता उपयोगी ठरु शकतात. त्यामुळे अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना क्रीडाविषयक सोयी सुविधा उपलब्ध करुन दिल्यास अनुसूचित जमातीतील विद्यार्थी अनेक खेळांमध्ये राज्य व राष्ट्रीय स्तरावर प्राविण्य संपादन करण्याची शक्यता आहे. समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभागाने उपरोक्त दि.१८.११.१९९५ च्या शासन निर्णयाद्वारे शिवछत्रपती क्रीडानगरी, पुणे येथे मध्यवर्ती क्रीडा केंद्र व राज्यातील वेगवेगळया १४ ठिकाणी क्रीडा प्रबोधिनी स्थापन केल्या आहेत. त्याच धर्तीवर अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी नंदुरबार येथे मध्यवर्ती क्रीडा केंद्र व इतर ठिकाणी क्रीडा प्रबोधिनी स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत मंत्रीमंडळाच्या मान्यतेनुसार शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे:-

शासन निर्णय :- राज्यातील अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी नंदुरबार या आदिवासी बहुल जिल्हयाच्या ठिकाणी मध्यवर्ती क्रीडा केंद्र व ईगतपुरी, जि.नाशिक येथे क्रीडा प्रबोधिनी स्थापन करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त क्रीडा प्रबोधिनीमध्ये ॲथलेटिक्स, जिम्नॅस्टिक्स्, जलतरण, वॉटर पोलो, बास्केट बॉल, कुस्ती, मल्लखांब, ज्युडो, वेट लिफ्टिंग, फुटबॉल, शुटिंग, हॉकी, वॅडमिंटन, टेबल टेनिस, खो-खो, धनुर्विद्या,कबड्डी, लॉन टेनिस, हॅन्डबॉल, स्क्वॅश, बॉल बॅडमिंटन, घोडेस्वारी इ.खेळांचा समावेश राहिल.

३. मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनी अंतर्गत विद्यार्थ्यांसाठी वसतिगृह, खेळांची मैदाने व इतर क्रीडा सुविधा तसेच क्रीडा प्रबोधिनीचे प्राचार्य व इतर क्रीडा प्रशिक्षक यांचे मानधन तसेच मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनीची कर्तव्ये व जबाबदाऱ्या ह्या सर्व बाबी

G.C.R. 74 - 09

रोटा/एच-१५०३[ बी[ ३००-८-०९]-१

क्रीडा विभागाने स्थापन केलेल्या मध्यवर्ती क्रीडा केंद्र व इतर क्रीडा प्रबोधिनीच्या धर्तीवर राहतील. याबाबतचा तपशील या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट-"अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील.

४. सदर मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनी निवासी असल्याने येथील आदिवासी विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय व्हावी नंदुरबार व ईगतपुरी येथे प्रत्येकी ७० मुले व ३० मुलींसाठी शासकीय आश्रमशाळा सुरु करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

५. मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनी यांच्यासाठी लागणारा कर्मचारी वृंद क्रीडा विभागाने स्थापन केलेल्या क्रीडा प्रबोधिनीच्या धर्तीवर ठराविक मानधनावर नियुक्त करण्याबाबतचा तपशील व इतर अनुषंगिक बाबी व त्यावरील खर्च मा.मंत्री, (आदिवासी विकास) यांच्या मान्यतेने आदिवासी विकास विभागाच्या स्तरावर निश्चित करण्यात येईल.

६. मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनी यांच्यावर संनियंत्रण ठेवण्यासाठी मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे उच्चस्तरीय धोरण समितीची स्थापना करण्यात येत आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| १) | मा.मुख्यमंत्री | : | अध्यक्ष |
| २) | मा.मंत्री (आदिवासी विकास) | : | उपाध्यक्ष |
| ३) | मा.मंत्री (क्रीडा) | : | सदस्य |
| ४) | मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) | : | सदस्य |
| ५) | सचिव (क्रीडा) | : | सदस्य |
| ६) | सचिव (आदिवासी विकास) | : | सदस्य |
| ७) | संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय | : | सदस्य |
| ८) | स[illegible]पर आयुक्त, आदिवासी विकास | : | सदस्य |
| ९) | शासनाने नियुक्त केलेले क्रीडा क्षेत्रातील ५ तज्ज्ञ | : | सदस्य |
| १०) | केंद्र प्रमुख, मध्यवर्ती क्रीडा केंद्र, नंदुरबार | : | सदस्य |
| ११) | आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक | : | सदस्य सचिव. |

७. वरील समितीवरील अशासकीय सदस्यांची नेमणूक होईपर्यंत समितीचे अध्यक्ष व इतर सदस्य समितीचे कामकाज पाहतील. उपरोक्त समितीची किमान दर तीन महिन्यानी किंवा आवश्यकतेनुसार सभा आयोजित केली जाईल.

८. आर्थिक भार : उपरोक्त मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनी स्थापन करण्यासाठी सुमारे रु.२५.०० कोटी इतका खर्च अपेक्षित आहे. सदर निधी आदिवासी उपयोजनेतून खालीलप्रमाणे उपलब्ध करुन देण्यात येईल :-

| अ.क्र. | वित्तीय वर्ष | वित्तीय तरतूद |
|---|---|---|
| १ | २००९-१० | रु. ५.०० कोटी |
| २ | २०१०-११ | रु.१०.०० कोटी |
| ३ | २०११-१२ | रु.१०.०० कोटी |

९. मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनी अंतर्गत विद्यार्थ्यांसाठी वसतिगृह, खेळांची मैदाने व इतर क्रीडा सुविधा याबाबतची अंदाजपत्रके व आराखडे शासनास प्राप्त झाल्यानंतर प्रशासकीय मान्यतेसह निधी उपलब्ध करुन देण्यात येईल.

१०. हा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. २४१/०९/व्यय-१४, दिनांक २१.७.२००९ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०८२५१९२२३५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( ग.गो.पंचभाई )
शासनाचे सह सचिव

**प्रति,**

मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.मंत्री (क्रीडा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई..
सचिव (क्रीडा), मंत्रालय, मुंबई.
महालेखापाल (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नंदुरबार, नाशिक.
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
विभागीय आयुक्त, नाशिक.
संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, अमरावती, नागपूर.
जिल्हाधिकारी, नंदुरबार, नाशिक.
जिल्हा क्रीडा अधिकारी, नंदुरबार, नाशिक.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
सचिव, आदिवासी विकास यांचे स्वीय्य सहायक, मंत्रालय, मुंबई.
सर्व सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव/कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
आदिवासी विकास विभाग, निवड नस्ती ( का.१२).

## मध्यवर्ती क्रीडा केंद्र, नंदुरबार व क्रीडा प्रबोधिनी, इगतपुरी जि. नाशिक यांच्या कार्याची रुपरेषा

### परिशिष्ट -"अ"

१. क्रीडा क्षेत्रात वैज्ञानिक पध्दतींचा अवलंब करुन, खेळाची अद्ययावत उपकरणे आणि प्रशिक्षण यावर अधिकाधिक प्रमाणात लक्ष केंद्रीत करण्याच्या धोरणाची सत्वर आणि प्रभावीपणे अंमलबजावणी करण्यासाठी राज्यात नंदुरबार येथे मध्यवर्ती क्रीडा केंद्र व इगतपुरी जि. नाशिक येथे क्रीडा प्रबोधिनी निर्माण करण्यात येतील.

२. ८ ते १४ या वयोगटातील अनुसूचित जमातीच्या मुलामुलींची निवड करुन व त्यांना ८ ते १० वर्षे प्रशिक्षण देवून राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय दर्जाचे खेळाडू तयार करणे हे मध्यवर्ती क्रीडा केंद्राचे व क्रीडा प्रबोधिनीचे मुख्य उद्दिष्ट राहील.

३. मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनीचा संकल्पित आराखडा मुख्यत्वे करुन उपलब्ध असलेल्या सोयीसुविधांचा जास्तीत जास्त उपयोग करुन घेण्याच्या दृष्टीकोनातून तयार करण्यात यावा. त्यात भविष्यात गरजेनुसार बदल होऊ शकेल.

४. मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनीच्या संकल्पित आराखड्यात मुख्यत्वे करुन खालील बाबींचा समावेश राहील :-

४ (१) <u>वसतिगृह</u> :

मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनीत मुलामुलींसाठी साधारणत: ७० मुले व ३० मुली याकरिता निवास व्यवस्था करण्यात येईल. याबरोबरच भोजनगृह, स्वयंपाक खोली, करमणूक कक्ष (यात एम.आय.रुम आणि वाचनालय तसेच अभ्यागत कक्ष यांचा समावेश असेल) वसतिगृह प्रमुखासाठी (पुरुष/महिला) रहाण्याची व्यवस्था तसेच प्रबोधिनी प्राचार्यासाठी कार्यालय व निवासस्थान तसेच स्वयंपाकी व वाढपी यांच्या निवासस्थानासाठी डॉर्मिटरिची व्यवस्थाही करण्यात यावी.

४ (२) <u>खेळांची मैदाने</u> :

प्रत्येक प्रबोधिनीमध्ये ४०० किंवा किमान २०० मीटर मातीचा धावनमार्ग असावा. त्याचबरोबर धावनमार्गाच्या मधील उपलब्ध जागेमध्ये उपरोक्त सर्व खेळासाठी मैदाने उपलब्ध करुन देण्यात यावीत. खेळाची प्रात्यक्षिके तसेच वर्ग भरविण्यासाठी एक अथवा दोन शेडस् उपलब्ध करुन देण्यात यावेत. पावसाळ्यात अशा शेडस्मध्ये काही खेळांच्या सुविधा उपलब्ध करुन देता येऊ शकतील. अशा शेडस् मध्ये खेळाचे साहित्य ठेवण्यासाठी, मल्टीजिमसाठी प्रशिक्षकांसाठी कार्यालय तसेच प्रसाधन गृह (मुलामुलींसाठी स्वतंत्र) याची व्यवस्था करण्यात यावी.

४ (३) <u>मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनी प्राचार्य</u> :

मध्यवर्ती क्रीडा केंद्र व क्रीडा प्रबोधिनी प्राचार्य यांच्याकडे संपूर्ण व्यवस्थापनाची जबाबदारी देण्यात यावी व त्यासाठी निवृत्त लष्करी अधिकारी अथवा अर्जुन ॲवार्ड विजेत्या खेळाडूंना प्रत्येकी रु.२५,०००/- दरमहा मानधनावर नेमण्यात यावे. प्राचार्यांच्या कार्यालयांत प्रत्येकी एक लघुलेखक, वरिष्ठ लिपिक, दोन लिपिक टंकलेखक, दोन चतुर्थश्रेणी कर्मचारी व एक वाहन चालक यांची नेमणूक करण्यात यावी.

४ (४) <u>क्रीडा प्रशिक्षक</u> :

निवड केलेल्या खेळाडूंस केंद्र बिंदू मानून सुरुवातीपासून उत्कृष्ट प्रशिक्षकाद्वारे त्यांचेवर खेळविषयक संस्कार घडविणे अत्यावश्यक असल्यामुळे त्या त्या क्षेत्रातील नामवंत प्रशिक्षकांना क्रीडा प्रशिक्षक म्हणून मानधनावर नेमणूक देण्यात यावी. मानद प्रशिक्षकांना खालीलप्रमाणे मानधन देण्यात यावे:-

| | <u>दरमहा मानधन</u> |
|---|---|
| (१) प्रथम श्रेणी | रु.१५,०००/- |
| (२) द्वितीय श्रेणी | रु. ९,०००/- |
| (३) तृतीय श्रेणी | रु. ५,०००/- |

४ (५) त्यामुळे शक्यतो प्रथम श्रेणीतील मानद प्रशिक्षक प्रबोधिनीवर नियुक्त करण्यात यावेत. क्रीडा प्रशिक्षकांची निवड करताना ती क्रीडा प्रकारानुसार करण्यात यावी व संबंधित खेळांसाठी त्या त्या खेळातील किमान एक प्रशिक्षक नियुक्त करण्यात यावा. याशिवाय मुलभूत सर्व खेळ प्रकारांसाठी एक प्रशिक्षक नियुक्त करण्यात यावा. प्रशिक्षकाची सेवा रोज किमान ५ तास (सकाळ व संध्याकाळ मिळून) अपेक्षित असल्यामुळे तसेच प्रशिक्षक हे मानधनावर असल्यामुळे इतर फावल्यावेळात त्यांना स्वतःचा व्यवसाय अथवा नोकरी करण्यास आडकाठी करण्यात येऊ नये. प्रशिक्षक नेमताना सुरुवातीला किमान एक वर्षाच्या कालावधीसाठी नियुक्ती करावी व त्यामुळे ती वेळोवेळी वाढविण्याबाबत योग्य तो निर्णय घेण्यात यावा.

४ (६) <u>इतर कर्मचारी</u> :

प्रथम श्रेणी मानद प्रशिक्षकाला मदतनीस म्हणून प्रत्येक खेळासाठी एक तृतीयश्रेणी प्रशिक्षक, मदतनीस (सहायक मार्गदर्शक) म्हणून नेमण्यात यावा व आवश्यकतेनुसार १ किंवा २ ग्राउंडमनची मानधनावर नेमणूक करण्यात यावी. सफाई कामगार, पहारेकरी, धोबी, तसेच भोजन व्यवस्था यासाठी कंत्राटी पध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

५. <u>स्पर्धा</u> :

प्रशिक्षणार्थीने शालेय क्रीडा स्पर्धा व राज्य संघटनांकडून आयोजित केल्या जाणाऱ्या नेहमीच्या स्पर्धांमध्ये सहभागी होणे आवश्यक आहे.

**६. <u>नंदुरबार येथील मध्यवर्ती क्रीडा केंद्राची व इगतपुरी येथील क्रीडा प्रबोधिनीची कर्तव्य व जबाबदाऱ्या.</u>**

(१) प्रशिक्षणार्थींची निवड करणे व त्यांना प्रशिक्षण देणे.

(२) प्रशिक्षणार्थींची शालेय शिक्षणाची व्यवस्था करणे.

३) प्रशिक्षणार्थींच्या क्रीडाविषयक व शालेय प्रगतीवर लक्ष ठेवणे तसेच अपेक्षित प्रगती न दाखविणाऱ्या प्रशिक्षणार्थीऐवजी मध्यवर्ती केंद्राच्या सल्ल्याने नवीन प्रशिक्षणार्थींची निवड करणे.

(४) प्रशिक्षणार्थींचा निवास, भोजन, वैद्यकीय मदत, क्रीडा प्रशिक्षण, सराव स्पर्धा यांवर देखरेख, पर्यवेक्षण व संनियंत्रण करणे.

(५) योग, मानसोपचार, क्रीडा वैद्यकशास्त्र, आहारशास्त्र व अशा बाबींना पूरक असणाऱ्या सोयी उपलब्ध करणे.

(६) बालवयातील अनुसूचित जमातीच्या मुलामुलींमधील उपजत क्रीडा गुण हेरुन त्यांना सर्वतोपरी मार्गदर्शन करणे आणि उत्तेजन देणे व सध्या अस्तित्वात असलेल्या क्रीडा संस्थेशी संपर्क ठेवणे व त्यांच्याजवळ असलेल्या अनुभवाचा, साधनसामुग्रीचा आणि क्रीडा प्रशिक्षकांचा जास्तीत जास्त उपयोग करुन घेण्यात यावा. प्रबोधिनीचे हे काम विस्तार सेवेसारखे म्हणजे एक्स्टेन्शन सर्व्हिससारखे असावे.

(७) क्रीडाविषयक प्रशिक्षणाला प्रयोगशाळेचीही जोड असेल आणि त्यासाठी क्रीडा वैद्यकशास्त्र, क्रीडा मानसशास्त्र, भौतिकोपचार (फिजिओथेरपी), मसाज, योगविद्या इत्यादि बाबतचे अत्युच्च प्रशिक्षण तंत्र आणि सहाय्य खेळाडूंना उपलब्ध करुन देण्यात यावे. त्याशिवाय दृकश्राव्य माध्यमांचा देखील अधिकाधिक वापर करण्यात यावा.

(८) अन्य राष्ट्रांतून नावाजलेल्या प्रशिक्षकांना आमंत्रित करुन प्रशिक्षक आणि खेळाडू यांचेसाठी चर्चासत्रे, प्रात्यक्षिके, व कार्यशाळा आयोजित करण्यात याव्यात.

(९) नंदुरबार येथील मध्यवर्ती क्रीडा केंद्राचे इगतपुरी येथील क्रीडा प्रबोधिनीवर प्रशासकीय नियंत्रण राहील.

******